किशोर वयीन मुलींचे सक्षमीकरण (SAG) या केंद्रपुरस्कृत योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेला निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.
**(केंद्र हिस्सा ६०% रु.१,९४,५९,२००.०० व राज्य हिस्सा ४०% रु.१,२९,७३,२००.००)**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१९ /प्र.क्र.१५४ /का.५**
**नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : १८ नोव्हेंबर,२०१९.**

**वाचा :- (१) वित्त विभाग,परिपत्रक क्रमांक -अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८ जुलै,२०१९.**
**(२) शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१८/प्र.क्र.५९/का-५, दिनांक १ फेब्रुवारी,२०१९.**

**प्रस्तावना :-**

किशोरवयीन मुलींकरिता योजना (SAG) ही केंद्रपुरस्कृत योजना राज्यातील सर्व जिल्हयातील वय वर्ष ११ ते १४ या वयोगटातील शाळाबाहय मुलींकरीता राबविण्यात येत आहे. सदर योजना ही राज्यात आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत पोषणाव्यतिरिक्त खर्चाकरीता केंद्र व राज्य हिश्याच्या निधीचे प्रमाण हे ६०% : ४०% असे ठरविण्यात आलेले आहे.

किशोरवयीन मुलींकरिता योजना (SAG) या केंद्रपुरस्कृत योजनेखालील आहाराव्यतिरिक्त खर्चासाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षाच्या राज्याच्या अर्थसंकल्पात केंद्र हिस्सा ६०% (लेखाशिर्ष २२३६ १८२९) रु.३,२४,३२,०००.००, व समरुप राज्य हिस्सा ४० % ( लेखाशिर्ष २२३६१८३८ ) रु.२,१६,२२,०००.०० इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे.

वित्त विभागाने योजनांवरील माहे डिसेंबर,२०१९ पर्यंतचा खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पीत तरतुदीच्या ६०% इतकी तरतूद वितरीत व खर्च करण्यास उपरोक्त संदर्भीत क्रमांक (१) च्या **दिनांक ०८ जुलै, २०१९ च्या परिपत्रकानुसार** मान्यता दिली आहे. त्यानुसार या योजनेकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता अर्थसंकल्पीत तरतूद वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

किशोरवयीन मुलींकरिता योजना (SAG) या केंद्रपुरस्कृत योजनेखालील आहाराव्यतिरिक्त खर्चासाठी सन २०१९-२० आर्थिक वर्षाकरीता मागणी क्रमांक एक्स-१,२२३६ (०७) किशोरवयीन मुलींचे सक्षमीकरण, (०७)(१५) किशोरवयीन मुलींच्या सक्षमीकरणासाठी राजीव गांधी योजनेला अनुदान (सबला) **(केंद्रहिस्सा ६०%) (कार्यक्रम)**, ३१- सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर ) ( लेखाशिर्ष

सांकेतांक २२३६१८२९)या खालील रु.३,२४,३२,०००.०० तरतूदीच्या ६०% म्हणजेच रु.१,९४,५९,२००.०० व समरुप राज्य हिस्सा ४०%, मागणी क्रमांक एक्स-१,२२३६ (०७) किशोरवयीन मुलींचे सक्षमीकरण, (०७)(१६) किशोरवयीन मुलींच्या सक्षमीकरणासाठी राजीव गांधी योजनेला अनुदान (सबला) **(राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम)**, ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ( लेखाशिर्ष सांकेतांक २२३६१८३८ ) या खालील रु.२,१६,२२,०००.०० तरतूदीच्या ६०% म्हणजेच रु.१,२९,७३,२००.०० अशी एकूण रु. ३,२४,३२,४००.०० (अक्षरी रुपये तीन कोटी चोवीस लक्ष बत्तीस हजार चारशे फक्त) इतकी तरतूद वितरीत व खर्च करण्यास आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना मान्यता कळविण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११८१५४४५२९०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.11.18 15:47:58 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानभवन,मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (महिला व बालविकास विभाग), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई.
९) सर्व जिल्हाधिकारी.
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
११) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
१२) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
१३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी ).
१४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई

१७) सर्व जिल्हा  कोषागार अधिकारी

१८) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२)/ वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय, मुंबई.

१९) अवर सचिव (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी केंद्र पुरस्कृत किशोर वयीन मुलींचे सक्षमीकरण (SAG) या  योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत किशोरवयीन मुलींच्या सक्षमीकरणासाठी राजीव गांधी योजनेला अनुदान (सबला) **(केंद्रहिस्सा ६०%)  (कार्यक्रम),** ३१- सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर ) ( लेखाशिर्ष सांकेतांक २२३६१८२९ )  याखाली रु.१,९४,५९,२००.००  व  समरुप राज्य हिस्सा ४०% किशोरवयीन मुलींच्या सक्षमीकरणासाठी राजीव गांधी योजनेला अनुदान (सबला) **(राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम),** ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ( लेखाशिर्ष सांकेतांक २२३६१८३८ ) याखाली रु.१,२९,७३,२००.००  अशी एकूण रु.३,२४,३२,४००.०० ( अक्षरी रुपये तीन कोटी  चोवीस लक्ष बत्तीस ह़जार चारशे फक्त)इतकी तरतूद आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना मंजूर केलेला निधी BDS  वर वितरीत करावा.

२०) निवड नस्ती (कार्यासन-५), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

-----